**शिशु विकास एज्युकेशन सोसायटी,नागपूर संचालित शिशु विकास माध्यमिक शाळा व शिशु विकास शाळा, महाल, नागपूर या शाळांचे, वांजरी वस्ती, वनदेवीनगर, नागपूर येथील स्थलांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३२३/प्र.क्र.४६८/२३ /एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २६ जून, २०२४

**वाचा :**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ ३३२१/प्र.क्र.४०१/एसएम-१ दिनांक २८ जुलै, २०२१.

**संदर्भ :**

१)विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांचे जा.क्र.शिउस /माध्य/ अ/६७९३/२०२१, दि.२१.१२.२०२२ रोजीचे पत्र.

२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांचे जा.क्र.शिउस /प्राथ/ ब/७९६५/२०२१, दि.२२.१२.२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

शिशु विकास एज्युकेशन सोसायटी, नागपूर संचालित शिशु विकास माध्यमिक शाळा व शिशु विकास शाळा, किल्लारोड, महाल, नागपूर या मराठी माध्यमाच्या अनुदानित माध्यमिक (इयत्ता ८ वी ते १० वी,युडास नं.२७०९१५०६९१४) व प्राथमिक (इ.१ ली ते ७वी, युडास नं.२७०९१४०६९०६ ) शाळांचे वांजरी वस्ती, वनदेवीनगर, यशोधरा नगर जवळ, नागपूर येथील स्थलांतरास कार्योत्तर मान्यता देण्याचे संदर्भाधीन पत्रांन्वये प्राप्त झालेले प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळांची इमारत मालकाने खाली करण्यास कळविल्याने स्थलांतर केले आहे. त्यामुळे सदर शाळांचे वर नमूद ठिकाणी केलेल्या स्थलांतरास खालील अटी व शर्तीवर कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) स्थलांतरीत शाळांची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच इच्छुक विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील.

(२) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होत्या, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहतील.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(४) दोन्ही शाळांच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाहीत.

(५) भविष्यात शासन मान्यतेशिवाय शाळेचे स्थलांतर करण्यात येणार नाही, याबाबत संस्थेने दक्षता घ्यावी.

(६) सदर स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

(७) सदर शाळेचे प्राथमिक व माध्यमिक विभाग प्रत्यक्षात एकत्रित कार्यरत आहेत. परंतु प्राथमिक व माध्यमिक विभागास स्वतंत्र Udise असल्याने दोन शाळा असल्याचे दिसते. सबब, प्रस्तुत स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही करण्यापूर्वी दोन्हीपैकी एक Udise code दुसऱ्यामध्ये विलीन करण्यात यावा व १ ली ते १० वी साठी भविष्यात एकच Udise कार्यरत राहील याची खबरदारी घेण्यात यावी

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांनी सदर शाळांच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२६१८२८५२३३२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2024.06.26 18:41:12 +05'30'

**(प्रविण मुंढे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर
३. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक), जिल्हा परिषद, नागपूर
४. अध्यक्ष/ सचिव शिशु विकास एज्युकेशन सोसायटी, नागपूर
५. निवडनस्ती (एसएम-१).